**संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय,मुंबई यांचे आस्थापनेवरील सहायक संचालक, गट "ब" या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून झालेली शिफारस / नियुक्ती रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन आदेश क्रमांक: औसुवआ-०४२४/प्र.क्र.५१/काम.-१**
मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १० जुलै, २०२४.

**पहा:-** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. आयएलआर-२१२१/प्र.क्र.१०३ /२०२३/ अठ्ठावीस, दि.७/९/२०२३.
२) शासन निर्णय क्र.औसुवआ-०९२३/प्र.क्र.१४८/काम.१,दि.२६/०२/२०२४.
३) शासन निर्णय क्र.औसुवआ-०३२४/प्र.क्र.३९/काम.१,दि.१८/०३/२०२४.
४) शासन पत्र क्र.औसुवआ-०२२४/प्र.क्र.३९/काम.१,दि.२०/६/२०२४.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय,मुंबई यांचे आस्थापनेवरील सहायक संचालक, गट "ब" या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यासाठी संदर्भीय क्र.१ च्या दि.०७/०९/२०२३ रोजीच्या पत्रान्वये ४४ उमेदवारांची शिफारस केली आहे. त्यामध्ये श्री.प्रशांत बागुल यांची आयोगाने भ.ज.(क) या प्रवर्गातून सहायक संचालक,गट-ब (राजपत्रित) या पदावरील नियुक्तीकरीता शासनास शिफारस केली आहे.

२. त्याअनुसार सदरहू ४४ उमेदवारांपैंकी या पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार व शासनाने दि.१२/१०/२०२३ रोजी उमेदवारांच्या अनुभव व कागदपत्रे यांची पडताळणी करण्यासाठी गठीत केलेल्या समितीच्या शिफारशीनुसार नियुक्ती प्राधिकारी यांच्या मान्यतेने सहायक संचालक, गट-ब या पदावरील नियुक्तीसाठी पात्र ठरलेल्या ३२ उमेदवारांना शासनाने संदर्भीय क्र.२ येथील दि.२६/२/२०२४ रोजीच्या आदेशाव्दारे नियुक्तीने पदस्थापना देण्यात येत असल्याचे आदेश जारी केले. त्यामध्ये श्री.प्रशांत बागुल यांचे नावाचाही समावेश होता.

३. त्याअनुसार संबंधित उमेदवारांना पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्यास ३० दिवसांचा कालावधी देण्यात आला होता. त्यापैकी श्री. बागुल यांचेसह काही उमेदवारांनी सदरहू पदावर रूजू होण्यासाठी मुदतवाढ देण्याची विनंती केली. त्याअनुसार नियुक्ती प्राधिकारी यांच्या मान्यतेने संदर्भीय क्र.३ येथील दि.१८/३/२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये त्यांना मुदतवाढ देण्यात आली होती. त्यामध्ये श्री.बागुल यांना रूजू होण्यासाठी १ महिन्याचा कालावधी देण्यात आलेला होता.

४. त्याप्रमाणे श्री.बागुल हे दि.२५/४/२०२४ पर्यंत पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होणे अपेक्षित होते. तथापि, सदर पदावर रूजू न होता, त्यांनी २५-२८ दिवसांनी दि.१५/४/२०२४ रोजीच्या विनंती अर्जान्वये अतिरिक्त १ महिन्याची मुदतवाढ (म्हणजे दि.२५/५/२०२४ पर्यंत) देण्याची विनंती केली. तथापि, ते प्रथम

मुदतवाढीच्या कालावधीत व त्यांना शेवटची संधी म्हणून उपरोक्त संदर्भीय क्र.४ येथील दि.२०/६/२०२४ रोजीच्या पत्राव्दारे नैसर्गिक न्याय तत्वाच्या आधारे दि.२५/६/२०२४ पर्यंत सहायक संचालक,गट-ब (राजपत्रित) या पदावर रूजू होण्याकरीता दिलेल्या कालावधीतही ते रूजू झाले नाहीत. याबाबत श्री.बागुल यांनी दि.२४/६/२०२४ रोजीच्या अर्जान्वये (ई-मेलव्दारे प्राप्त) आणखी अतिरिक्त १ महिन्याची (म्हणजे ३०.७.२०२४ पर्यंत) मुदतवाढ देण्याबाबत दि.३०/६/२०२४ रोजीपर्यंत कळविण्याची विनंती केली आहे. जेणेकरून त्यांना Resignation Approval ला २५ ते ३० दिवसांचा कालावधी मिळेल. तथापि, श्री.बागुल यांना शासनाने दि. २५/३/२०२४ पासून दि. २५/६/२०२४ पर्यंत (प्रथमत: दिलेला ३० दिवसांचा रूजू होण्यासाठीचा कालावधी वगळून) ३ महिने इतका अधिकचा कालावधी देवूनही ते या विभागाच्या सहायक संचालक,गट-ब (राजपत्रित) या पदावर रूजू झाले नाहीत. यावरून त्यांना या पदावर रूजू होण्यास स्वारस्य नसल्याचे दिसून आले.

५. यास्तव श्री.बागुल यांचेप्रकरणी सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२८/५/२०१८ च्या शासन निर्णयातील परि.३ मधील तरतुदीस अनुसरून नियुक्ती प्राधिकारी यांच्या मान्यतेने त्यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेली शिफारस/ नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

या विभागाच्या अधिनस्त संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून संदर्भीय क्र.१ येथील दि.७/०९/२०२३ च्या पत्राव्दारे केलेली शिफारस व त्यास अनुसरून शासनाने संदर्भीय क्र.२ येथील दि.२६/२/२०२४ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे सहायक संचालक, गट-ब (राजपत्रित) या पदावर श्री. प्रशांत सुरेश बागुल या उमेदवाराची केलेली नियुक्ती खालीलप्रमाणे रद्द करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | उमेदवारांचे नांव | गुणवत्ता क्रमांक | मुळ प्रवर्ग | मलोआ ने शिफारस केलेला प्रवर्ग |
|---|---|---|---|---|
| १. | श्री.प्रशांत सुरेश बागुल | २१ | भ.ज.(क) | भ.ज.(क) (सर्वसाधारण-१) |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१०१४२७४८०४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK UTTAMRAO POKALE

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=856b31c793b12e4f22cb247c5cff7f3358867f2482aa2234f6131bf8940dbd2e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F4163205E7B4960CC7CA6F973D6DEB06502B2E8FC47A411BABCF42A0E99CF34B, cn=DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2024.07.10 14:39:41 +05'30'

**( दिपक पोकळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

श्री.प्रशांत सुरेश बागुल,
सहायक संचालक, गट-ब (शिफारसप्राप्त उमेदवार) **( ई-मेलव्दारे )**

**प्रत:-**

१) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२) मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

३) मा.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे**)

४) उप सचिव/अवर सचिव (कामगार-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई

५) संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय,मुंबई.

६) सह/उप सचिव,सामान्य प्रशासन विभाग / कार्या.१२/१६-ब, मंत्रालय, मुंबई

७) निवड नस्ती (काम.१)